“श्री क्षेत्र सप्तश्रृंगी देवी, वणी, ता.कळवण जि.नाशिक तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत” सन २०२४-२५ मधील निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.५८/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २९ मार्च, २०२५

**वाचा :** १) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०२३/प्र.क्र.१०१/का.१४४४-अ, दि.३०.११.२०२३
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.१०१/का.१४४४-अ, दि.२१.०६.२०२४
३) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.५८/का.१४४४-अ, दि.१९.०७.२०२४ व दि.०५.०३.२०२५

**प्रस्तावना :**

वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये “श्री क्षेत्र सप्तश्रृंगी देवी, वणी, ता.कळवण जि.नाशिक तीर्थक्षेत्र विकास आराखडयास” रु.८१.८६ कोटीच्या कामांना मंजुरी देण्यात आली आहे. वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये “श्री क्षेत्र सप्तश्रृंगी देवी, वणी, ता.कळवण जि.नाशिक तीर्थक्षेत्र विकास आराखडयाच्या” लेखाशीर्षास मंजूरी देण्यात आली आहे. वाचा क्र.३ येथील शासन निर्णयांन्वये सदर विकास आराखडयास रु.२०.०० कोटी निधी वितरित करण्यात आला आहे. आता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी सदर विकास आराखड्यास सामायिक लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध झालेल्या निधीमधून जिल्हाधिकारी, नाशिक यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

“श्री क्षेत्र सप्तश्रृंगी देवी, वणी, ता.कळवण जि.नाशिक तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत” समाविष्ट असलेल्या विविध कामांकरिता सन २०२४-२५ साठी रु.२५.९४७१ कोटी इतका निधी (रुपये पंचवीस कोटी चौऱ्याण्णव लाख एकाहत्तर हजार फक्त) जिल्हाधिकारी, नाशिक यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.कोटी)

| अ. क्र. | सामायिक लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२४-२५ चे सुधारित अंदाज | यापूर्वी सन २०२४-२५ मध्ये या आराखडयासाठी वितरीत निधी | जिल्हाधिकारी, नाशिक यांना आता प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| १. | ५४५२ ०२११ ५३-मोठी बांधकामे | ३५०.०० | २०.०० | २५.९४७१ |

२.    “श्री क्षेत्र सप्तश्रृंगी  देवी, वणी, ता.कळवण जि.नाशिक” या विकास आराखडयाअंतर्गत मंजूर कामांवर होणारा सदरहू खर्च सामायिक “लेखाशिर्ष ५४५२ पर्यटनावरील भांडवली खर्च, (००) (१५) तीर्थक्षेत्र व पर्यटन स्थळ विकास आराखडा (कार्यक्रम) (५४५२ ०२११), ५३-मोठी बांधकामे,” याखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३.    सदर प्रयोजनासाठी झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी, नाशिक यांनी करावी. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, नाशिक यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४.    सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२३९/२०२५/व्यय-८, दिनांक २८.०३.२०२५ अन्वये प्रदान केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१६३८४६३४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKUMAR GANGARAM RAUT

Digitally signed by NANDKUMAR GANGARAM RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2364c4585e9e2f4e1a3eb4e4ad8e29fd11241a0ac1929b933f28fc39d2906d11, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EFAB5769910D3540376EC2062B6C2A6B1BD6E7BC121FF37D75E24F4318761C66, cn=NANDKUMAR GANGARAM RAUT
Date: 2025.03.29 16:39:26 +05'30'

**(नंदकुमार राऊत)**
**शासनाचे अवर सचिव**

आवश्यक कार्यवाहीसाठी,

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक .
२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक.

प्रत,

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
५. कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. कार्यासन (व्यय-८, अर्थ -१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४४-अ, मंत्रालय, मुंबई